महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजिविका अभियाना अंतर्गत विशेष कौशल्य विकास प्रकल्पासाठी (DDU-GKY) सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाचा निधी वितरीत करण्याबाबत.
**(केंद्र हिस्सा -२५०१ २९५३,राज्य हिस्सा -२५०१ २९३५),**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२० / प्र.क्र.८ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १७ सप्टेंबर, २०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वि. वि, क्र.अर्थसं-२०२० / प्र.क्र.६४ / अर्थ-३, दि. १६.०४.२०२०.
२) शासन परिपत्रक, वि.वि., क्र. अर्थसं-२०२०/ प्र.क्र. ६५/ अर्थ-३, दि. ०४.०५.२०२०
३) केंद्र शासन, ग्राम विकास मंत्रालय यांचे पत्र, क्र.जे-१७०२५/०१/२०१५ डीडीयु-जीकेवाय-३३/सी, दि.२४.१२.२०१९.
४) ग्राम विकास विभागाची नस्ती क्र.मजिअ-२०२०/ प्र.क्र.१०/ यो-३.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानाकरीता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.टी-५, २५०१-विशेष ग्राम विकास कार्यक्रम,०१-एकात्मिकृत ग्राम विकास कार्यक्रम, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, ०१-जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१)(०६)-महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजिविका अभियाना अंतर्गत विशेष कौशल्य विकास प्रकल्पासाठी वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा) (२५०१ २९५३), ३३-अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली एकूण रू. ५०४०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून राज्य हिश्श्याच्या (०१)(०५)- महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजिविका अभियान राज्य हिस्सा (२५०१ २९३५), ३३-अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली रू.३३६०.०० लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पित आहे.

२. संदर्भाधीन क्र. ४ येथील ग्राम विकास विभागाच्या प्रस्तावास अनुसरुन सन २०२०-२१ करीता उपरोक्त केंद्र व राज्य हिश्श्याकरिता अर्थसंकल्पित तरतुदीच्या ३० टक्के निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार केंद्र हिस्सा (२५०१ २९५३) या लेखाशीर्षाखालील रू. १५१२.०० लाख (पंधरा कोटी बारा लाख फक्त ) इतका व राज्य हिश्श्याच्या (२५०१ २९३५) या लेखाशीर्षाखालील रू.१००८.०० लाख ( दहा कोटी आठ लाख फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यात येत आहे.

३. प्रकरणी नियंत्रक अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व ग्राम विकास विभाग, मंत्रालय,मुंबई. यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रक अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तीक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २११/व्यय-१५, दि २१.०८.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१११२१०१८९५२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.09.17 14:30:57 +05'30'

(रविंद्र दि. औटे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. कार्यासन क्र. २ व १७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
११. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.